उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल अवमान याचिका क्र.२६०/१० मध्ये प्रतिवादी पोलीस अधिका-यांना विधी सहाय्य मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
शासन निर्णय क्रमांक :एसपीपी २०१०/प्र.क्र.३४७/पोल-१०
गृह विभाग, मंत्रालय मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २१ एप्रिल, २०११.

संदर्भ - पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे क्र. १९२/पोआ/सहपोआ/कावसु/वा/२०११, दि. निरंक चे पत्र.

शासन निर्णय :- खार पोलीस ठाण्याचे तत्कालीन वरिष्ठ पोलीस निरिक्षक श्री.अजित प्रभाकर सावंत (सध्या नेमणूक अपर पोलीस उप आयुक्त, ॲन्टी करप्शन ब्युरो, बृहन्मुंबई) यानी श्री.गोल्डी सुद यांच्यावर केलेल्या कारवाईमुळे श्री.गोल्डी सुद यांनी त्यांच्यावर व त्यांच्यासोबत त्यावेळी खार पोलीस ठाण्यात कार्यरत असलेले पोलीस निरीक्षक श्री.सिराज शेख (सध्या नेमणूक वरिष्ठ पोलीस निरीक्षक, कालीना मुख्यालय) यांच्याविरुद्ध उच्च न्यायालय, मुंबई येथे क्र. २६०/२०१० अन्वये अवमान याचिका दाखल करुन त्यामध्ये नमूद पोलीस अधिका-यांना प्रतिवादी केले आहे.

२. प्रस्तुत प्रकरण हे उपरोक्त नमूद अधिकारी शासकीय कर्तव्य पार पाडीत असताना नोंद केलेल्या गुन्ह्यातून उद्‌भवलेले असून उच्च न्यायालय, मुंबई यांच्या समोरील सुनावणी मध्ये त्यांना शासकीय विधीविषयक कामकाज नियमावली, १९८४ मधील नियम १०९ (४) (अ), तसेच मुंबई पोलीस नियम पुस्तिकेमधील तरतुदीनुसार विधी सहाय्य मंजूर करण्यास व त्यांची बाजू सरकारी वकील, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई यांनी मांडण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

३.     हा शासन निर्णय विधी व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३००-२०११/ई, दि.६.०४.२०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४.     सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०४२११३३७४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि. वि. दपके)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) सह पोलीस आयुक्त (गुन्हे), बृहन्मुंबई.
२) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) सरकारी वकील, उच्च न्यायालय (मूळशाखा), मुंबई.
४) श्री. अजित सावंत, अपर पोलीस उपायुक्त, ॲन्टी करप्शन ब्युरो, बृहन्मुंबई
५) श्री.सिराज शेख, वरिष्ठ पोलीस निरीक्षक, कालीना मुख्यालय, मुंबई.
६) विधी व न्याय विभाग, (ई शाखा) मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती (पोल-१०).